**मोटार वाहन विभागाच्या वायुवेग पथकांना पोर्टेबल वजनकाटे GeM पोर्टलवरुन खरेदी करण्यास व त्यापोटी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१२१९/प्र.क्र.२७१/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ३१ जानेवारी २०२०

वाचा :-

१) **उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग- ४, दि.०१.१२.२०१६**
२) **उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७**
३) **अपर परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का-२अ/सीतना-पोर्टेबल-वे.बी./२०१९/जा.क्र १६४२८,दि.१६.११.२०१९**

**प्रस्तावना :-**

मोटार वाहन कायदा १९८८ च्या कलम ११३ मध्ये क्षमतेपेक्षा जास्त वजनाची वाहतूक करण्यास प्रतिबंधात्मक तरतूदी आहेत. तसेच कलम ११४ नुसार जादा भारवाहक वाहनांची तपासणी करण्याचे अधिकार मोटार वाहन विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. कलम ११४ नुसार मोटार वाहन विभागाच्या अधिकाऱ्यास ज्या वाहनाबाबत शंका असेल असे वाहन वजनकाट्यावर आणण्याचे अधिकार आहेत. अशा वाहनाच्या तपासणीनंतर वाहनात जादा भार आढळल्यास ते उतरविण्याचे व असे केल्याशिवाय वाहन पुढे जाऊ न देण्याची तरतूद आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र मोटार वाहन नियम, कलम २२३ मध्ये तपशिलवार पध्दती नमूद केली आहे. संपूर्ण राज्यात जादा भारविषयक अंमलबजावणी अधिक तीव्रतेने करुन राज्यातील जादा भार वाहतूकीस प्रतिबंध करण्यासाठी राज्यातील वायुवेग पथकांसहीत चालकांना योग्य पोर्टेबल (Portable) वजनकाटे उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय :-

राज्यात जादाभारविषयक अंमलबजावणी अधिक तीव्रतेने करुन राज्यातील जादाभार वाहतुकीस प्रतिबंध करण्याच्या दृष्टीने राज्यातील मोटार वाहन विभागाच्या वायुवेग पथकांना सहज बाळगण्यायोग्य १५ पोर्टेबल (Portable) वजनकाटे GeM पोर्टलवरुन खरेदी करण्यास व त्यासाठी प्रती वजनकाटा अंदाजे रु.२५,००,०००/- या प्रमाणे येणा-या एकुण रु.३,७५,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या रकमेस पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१) उद्योग,उर्जा व कामगार विभागाने शासकीय विभागांना खरेदीसाठी विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार व नियमांतील तरतूदीनुसार खरेदी प्रक्रिया करावी.

१) जादा भार नियमाची अंमलबजावणी करण्यासाठी पोर्टेबल वजन काट्यांचा उपयोग करताना, कार्यवाहीत पारदर्शकता रहाण्यासाठी वजन व चलन यांची यंत्रणा एकत्रित जोडली असणे आवश्यक आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (०१)(०७) साधनसामग्रीची खरेदी (२०४१ ०३३२) (कार्यक्रम) ५२ यंत्रसामग्री व साधन सामग्री" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला,उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३११७३१५२२४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.02.01 17:10:43 +05'30'

**( द.ह.कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती (परिवहन-४)